क्रमांक एमएससी. ०३८८/सीआर. ५०८/पोल-५अ,

गृह विभाग, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२,
दिनांक - २७ नोव्हेंबर १९८९.

विषय :- सशस्त्र आणि निशस्त्र पोलीस शाखेमधील फरक दूर करणे व पोलीस शिपायांसाठी एकच संवर्ग निर्माण करणे.

संदर्भ :- आपले पत्र क्रमांक ६/७७८४, दिनांक ७ ऑक्टोबर १९८८.

सशस्त्र आणि निशस्त्र पोलीस शाखेमधील फरक दूर करणे व पोलीस शिपायांसाठी एकच संवर्ग निर्माण करणे याबाबत शासन पत्र, गृह विभाग, क्रमांक एमएससी. ०३८२/१/पोल-५अ, दिनांक २८ ऑक्टोबर १९८६ च्या परिच्छेद २ मध्ये अंतर्भूत असलेल्या आदेशात आंशिक फेरबदल करून खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

१] जानेवारी १९८७ पासून फक्त पोलीस शिपाई म्हणून भरती झालेल्या पोलीस शिपायांनी प्रादेशिक पोलीस प्रशिक्षण विद्यालयात प्राथमिक प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर त्यांची खालीलप्रमाणे विभागणी करावी :-

[अ] ५० टक्के सशस्त्र कामे करण्यास पाठवावेत,

[ब] ५० टक्के निशस्त्र कामे करण्यास पाठवावेत.

२] पोलीस प्रशिक्षण विद्यालयामधून पोलीस शिपाई पदाचे संपूर्ण प्राथमिक प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर त्या पोलीस शिपायांची अंतिम परिक्षेमध्ये उत्तीर्ण झालेल्या अनुक्रमांकाचे आधारे सशस्त्र आणि निशस्त्र कामे करण्यास नेमणूक करण्यात यावी. ज्यांचे विषम क्रमांक आहेत त्यांना ३ वर्षे सशस्त्र कामे करण्यास पाठविण्यात यावे आणि ज्यांचे सम क्रमांक आहेत त्यांना ३ वर्षे निशस्त्र कामे करण्यास पाठवावे. ५० टक्के सशस्त्र किंवा निशस्त्र कामे देण्यास, रिक्त जागांच्या प्रमाणानुसार जास्त किंवा कमी पडत असतील तर ही संख्या संबंधित शाखेमधील पोलीस शिपायांना पाठवून संख्या जुळवून घेण्यात यावी.

३] या सर्वांची ३ वर्षे सेवा झाल्यानंतर अदलाबदल करून निशस्त्र ते सशस्त्र आणि सशस्त्र ते निशस्त्र कामे करण्यासाठी नेमावेत. यामुळे जे पोलीस शिपाई सशस्त्र कामे करण्यासाठी नेमले होते त्यांना निशस्त्र कामाचे विस्मरण होणार नाही.

४] मुख्यालयामध्ये पोलीस कर्मचा-यांचा सशस्त्र कामे करावयाचा कालावधी ३ वर्षापेक्षा जास्त, तर निशस्त्र कामे करावयाचा कालावधी ५ वर्षापेक्षा जास्त नसावा. बृहन्मुंबईचे बाबतीत हे प्रमाण अनुक्रमे २ आणि ६ असे असावे. तथापि, सदरहू कालावधी पोलीस महासंचालक यांनी नियतकालीक अवलोकन करून ठरवावा.

५] शासन पत्र दिनांक २८ ऑक्टोबर १९८६ मध्ये, फक्त नव्याने पोलीस शिपाई म्हणून भरती झालेल्या पोलीस कर्मचा-यांसाठी आणि त्याचप्रमाणे सन १९८६ पासून पूर्वी सशस्त्र शाखेत असलेल्या पोलीस कर्मचा-यांना सशस्त्र ते निशस्त्र म्हणून कामे करण्यासाठी कसे पाठवावे या संबंधीचे आदेश आहेत. परंतु त्यामध्ये सन १९८६ व त्या पूर्वीच्या निशस्त्र पोलीस कर्मचा-यांना सशस्त्र कामे देण्यासंबंधीचे आदेश नाहीत. सशस्त्र आणि निशस्त्र हा फरक संपूर्णपणे दूर करून त्यांचे एकत्रीकरण व्हावे यासाठी सन १९८६ व त्या पूर्वी सेवेत असलेल्या सशस्त्र पोलीस कर्मचा-यांना १/५ [२० टक्के] या प्रमाणात प्रत्येक वर्षी निशस्त्र कामे करण्यासाठी नेमावे. त्यांना निशस्त्र कामे करण्यासाठी लागणारा साडेतीन महिन्याचा उजळणी पाठयक्रम पूर्ण करावा लागेल. त्याचप्रमाणे निशस्त्र पोलीस कर्मचा-यांना सशस्त्र कामे करण्यासाठी नेमावे. ही प्रक्रीया ५ वर्षात पूर्ण करण्यात यावी.

६] सुरुवातीस सर्वच पोलीस शिपायांना कमीत कमी १० वर्षे जिल्हा/शहर मुख्यालयात सशस्त्र कामे देण्यात येण्याबाबतचा कालावधी ३ वर्षे करण्यात यावा. त्याचप्रमाणे राज्य राखीव पोलीस दलातील कर्मचा-यांची जिल्हा/शहर पोलीस दलात बदली झाल्यानंतर त्यानी ५ वर्षे सशस्त्र कामे करण्याबाबतचा कालावधीसुध्दा तीन वर्षे करण्यात यावा.

७] सन १९८६ व त्यापूर्वी असलेले सर्वच सशस्त्र पोलीस कर्मचारी निशस्त्र कामे करण्यास पात्र असतील. त्यासाठी त्यांची जी शैक्षणिक पात्रता असेल ती आड येणार नाही.

८] सशस्त्र पोलीस हवालदार आणि सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक यांना सुध्दा सशस्त्र शाखेतून निशस्त्र कामे देण्यासाठी नेमावे. याचप्रमाणे निशस्त्र पोलीस हवालदार आणि सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक यांनासुध्दा सशस्त्र कामे करण्यासाठी नेमावे.

९] ज्या पोलीस कर्मचा-यांना सशस्त्र कामे द्यावयाची आहेत त्यांची जिल्हा/शहर मुख्यालयात नेमणूक करण्यात यावी. त्याठिकाणी त्यांना मुख्यालयातील सर्व कर्तव्ये करावी लागतील.

अ] पोलीस मुख्यालयातील कामे :-

१] सशस्त्र पोलीस करीत असलेली गार्ड आणि सेन्ट्री डयुटीची सर्व प्रकारची कामे उदा. निवासी रक्षक [क्वार्टर गार्ड], कोषागार रक्षक [ट्रेझरी गार्ड], रूग्णालय रक्षक [हॉस्पीटल गार्ड], शस्त्रागारावरील रक्षक, गार्ड अॅट सिक्युरिटी इन्स्टॉलेशन.

२] एस्कॉर्ट डयुटी उदा. कैद्याची ने-आण [प्रिझनर्स एस्कॉर्ट], कोषागारातून दुसरीकडे रक्कम नेणे [ट्रेझरी एस्कॉर्ट] इत्यादी.

३] जिल्हा मुख्यालयातील राखीव पोलीस लाईनमधील इतर सर्वसाधारण कामे, उदा. पिकेटची कामे, वरिष्ठ अधिका-यांचा सुरक्षा रक्षक, मुख्यालयातील राखीव पोलिस निरीक्षक/उपनिरीक्षक यांचे अधिपत्याखालील कार्यालयीन कामे आणि टपालाची कामे.

४] प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्यासंबंधी असलेली मुख्यालयातील कामे.

५] मुख्यालयातील राखीव सशस्त्र कामे, उदा. पोलीस महानिरीक्षक यांचे राखीव की जो अतिरिक्त बंदोबस्त डयुटीसाठी नेमण्यात आलेला आहे.

ब] सर्वसाधारण निशस्त्र कामे :-

| | |
|---|---|
| १] बीट आणि पेट्रोल डयुटी | [बीट अॅन्ड पेट्रोल] |
| २] तपास | [इन्व्हेस्टीगेशन] |
| ३] ठाणे अंमलदार | [स्टेशन हाउस] |
| ४] बंदोबस्त | |
| ५] समन्स आणि वॉरंट बजावणे | |
| ६] संनिरीक्षण | [सर्व्हेयलन्स] |
| ७] पोलीस स्टेशनमधील व्यवस्था | [हाउसकिपिंग अॅन्ड पोलीस स्टेशन] |
| ८] वाहतूक | [ट्रान्सपोर्ट] |
| ९] ठराविक जागेवर दिलेली डयुटी | [फिक्सड् पॉईंट्स] |
| १०] जिल्हा विशेष शाखा आणि स्थानिक गुन्हा शाखा | [डी. एस. बी. आणि एल. सी. बी. ] |

११] पोलीस चौकी, इत्यादी.

१२] लॉक अप रक्षक, इत्यादी [ ही कामे सशस्त्र पोलीस कर्मचा-यांकडून केली जातात, परंतु आता हे निशस्त्र काम समजण्यात आले आहे. पोलीस ठाण्याचा अंमलदार अशा प्रकारची कामे पाळीपाळीने पोलीसांकडून करुन घेईल ].

१०] सामाईक सेवाज्येष्ठता सूची :-

सशस्त्र आणि निशस्त्र संवर्गाचे एकत्रिकरण करावयाचे असल्यामुळे दिनांक १.जानेवारी १९८७ पासून पोलीस शिपाई, पोलीस हवालदार आणि सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक यांचेसाठी तीन वेगवेगळया एकत्रित सेवा ज्येष्ठता सूची [हॅन्ड रजिस्टर्स] तयार करण्यात याव्यात. पोलीस शिपायांची सेवाज्येष्ठता त्यांचे नियुक्तीच्या दिनांकापासून धरण्यात यावी. जर दोन पोलीस शिपायांची नियुक्तीची तारीख एकच असेल तर त्या पोलीस शिपायांच्या जन्म तारखेप्रमाणे सेवा ज्येष्ठता ठरवावी. पोलीस हवालदार आणि सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक यांचे बाबतीत सेवा ज्येष्ठता निश्चित करतांना सशस्त्र आणि निशस्त्र शाखेतील जे पोलीस कर्मचारी एकाच ब्रॅचचे आहेत, परंतु या दोन्हीपैकी कोणत्याही एका शाखेचा जो कर्मचारी अगोदर पदोन्नत झाला असेल, त्यास दुस-या शाखेतील त्याच बॅचमधील शेवटचा कर्मचारी [पदोन्नती नाकारल्याने व पदोन्नतीसाठी डावलण्यात आलेले [सूपरसिडेड] कर्मचारी सोडून] ज्यावर्षी पदोन्नत झाला असेल, त्यावर्षी पदोन्नत झाला असे मानण्यात यावे. त्यानंतर त्यांची आंतरज्येष्ठता मात्र पोलीस शिपाई पदाच्या नियुक्तीच्या दिनांकानुसार निश्चित करावी.

पोलीस हवालदार आणि सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक यांची समाईक सेवा ज्येष्ठता सूची तयार करताना वर नमूद केलेल्या कार्यप्रणालींची आवश्यकता आहे. कारण अनुभव असा आहे की, सशस्त्र व निशस्त्र शाखेतील कर्मचा-यांना वेगवेगळया सेवा ज्येष्ठतेनुसार पदोन्नती मिळते आणि या दोन्हींची जर त्यांचे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवा ज्येष्ठता निश्चित केली, तर त्यामुळे कोणत्या तरी एका शाखेतील कर्मचा-यावर अन्याय होईल. वरील पध्दती प्रमाणे तयार करण्यात आलेल्या समाईक सेवा ज्येष्ठता सूची अन्वयेच यापुढे पदोन्नती देण्यात याव्यात.

२. वरील आदेशांशी शासन पत्र, गृह विभाग, क्रमांक एसएससी. ०३८२/१/पोल-५अ, दिनांक २८ ऑक्टोबर १९८६ च्या परिच्छेद २ मधील आदेश जेवढयापुरते विसंगत असतील तेवढयापुरते ते रद्द करण्यात येत आहेत.

मं. प. शिरसाट

[ मं. प. शिरसाट ]

उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

..५..

क्रमांक एसएसती. ०३८८/तीआर. ५०८/पोल-५अ,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक - २५ नोव्हेंबर १९८९.

प्रत माहितीसाठी अग्रेषित :-

१] पोलिस आयुक्त, बृहन्मुंबई,

२] कार्यासने - पोल-३ / पोल-४ / पोल-५ब, गृह विभाग.

म. प. शिरसाट

[ मं. प. शिरसाट ]

उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.